**श्रीमती ज्योती सुनेंद्र कवाडे, सहायक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित) यांचा परिविक्षा कालावधी समाप्त करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.पकानि-१५१६/२१८१/प्र.क्र.३४६/२०१६/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
**दिनांक :- ३० मार्च, २०१७.**

पहा :- १. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.टिपीव्ही-१२/१३/१०३०/प्र.क्र.१७६/नवि-२७, दि.०४.०३.२०१४.
२. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यकारी आदेश क्र.आस्था/गट-अ/ससंनर/ना.नि./प्रशा-१/११९९, दि.०४.०३.२०१४.
३. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आस्था/ज्योसुक-ससंनर/परिविक्षा/प्रशा-१ब/६४६३, दि.०५.१२.२०१६.

प्रस्तावना :-

नगर विकास विभागाच्या संदर्भाधिन दि.०४.०३.२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये श्रीमती ज्योती सुनेंद्र कवाडे यांची महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार म्हणून "सहायक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित)" पदावर दोन वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीकरिता सरळसेवेने नियुक्ती करण्यात येऊन सहायक संचालक, नगर रचना, मूल्यांकन, नाशिक पदावर पदस्थापना करण्यात आली होती. नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या संदर्भाधिन दि.०४.०३.२०१४ रोजीच्या कार्यकारी आदेशानुसार त्या दि.११.०४.२०१४ (म.पू.) रोजी उक्त पदावर हजर झाल्या होत्या.

०२. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्या संदर्भाधिन दि.०५.१२.२०१६ रोजीच्या पत्रान्वये श्रीमती ज्यो. सु. कवाडे, सहायक संचालक, नगर रचना यांचा परिविक्षा कालावधी समाप्त करुन त्यांची "सहायक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित)" पदावर नियमित नियुक्ती करण्याबाबतचा प्रस्ताव मान्यतेस्तव सादर केलेला आहे.

०३. श्रीमती ज्यो. सु. कवाडे, सहायक संचालक, नगर रचना यांचा ०२ वर्षाचा परिविक्षा कालावधी दि.११.०४.२०१४ (म.पू.) पासून सुरु होऊन, दि.१०.०४.२०१६ रोजी संपुष्टात येणे अपेक्षित होते. तथापि, त्यांनी परिविक्षा कालावधीत एकूण ३१ दिवसांची रजा उपभोगल्याने त्यांचा परिविक्षा कालावधी दि.११.०४.२०१६ पासून पुढे ३१ दिवसांनी वाढून दि.११.०५.२०१६ रोजी संपुष्टात येईल. त्यानुषंगाने श्रीमती ज्यो. सु. कवाडे, सहायक संचालक, नगर रचना यांचा दोन परिविक्षा कालावधी समाप्त करुन त्यांची "सहायक संचालक, नगर रचना (गट-अ/राजपत्रित)" पदावर नियमित नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे शासन आदेश देण्यात येत आहेत. :-

**शासन निर्णय :-**

श्रीमती ज्योती सुनेंद्र कवाडे, सहायक संचालक, नगर रचना, मूल्यांकन, ठाणे ह्या "सहायक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित)" पदाच्या सेवाप्रवेश नियमातील अटी व शर्तींची तसेच इतर अनुषंगिक सेवाविषयक बाबींची पूर्तता करित आहेत. त्यांनी ०२ वर्षाचा परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केला असल्याने, महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम ३९ अपवाद १ (ए) (एक) मधील तरतुदीनुसार त्यांचा “सहायक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित)” (वेतनसंरचना पीबी-३, रु.१५,६००-रु.३९,१००+ग्रेड पे रु.६,६००) पदाचा ०२ वर्षाचा परिविक्षा कालावधी दि.११.०५.२०१६ (म.नं.) रोजी संपुष्टात आणण्यात येत येऊन दि.१२.०५.२०१६ (म.पू.) पासून उक्त पदावर नियमित नियुक्ती करण्यात येत आहे.

**०२.** सदरचे आदेश सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.परिवि-२७१५/प्र.क्र.२०३/आठ, दि.२५ ऑगस्ट, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

**०३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेताक **२०१७०३३०१६४२४८७८२५** असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Eknath Kisan Sahane

Digitally signed by Eknath Kisan Sahane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c2f7e29994246b598ed0f72234360bb639afd8fae26e0e723 8d80dcb921ce52a, cn=Eknath Kisan Sahane
Date: 2017.04.21 16:57:28 +05'30'

**( ए. कि. सहाणे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

श्रीमती ज्योती सुनेंद्र कवाडे, सहायक संचालक, नगर रचना, मूल्यांकन, ठाणे यांना **(संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत)**

**प्रत माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीस्तव :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
३. महालेखापाल (लेखा परिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा परिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई / नागपूर.
६. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. **(०३-प्रती)**
७. सह संचालक, नगर रचना, कोंकण विभाग, कोंकण भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई.
८. सह संचालक, नगर रचना, मूल्याकंन, पुणे.
९. सहायक संचालक, नगर रचना, मूल्यांकन, ठाणे.
१०. सबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, -------------------.
११. निवडनस्ती / नवि-२७.

*****